बेलोरा, जिल्हा अमरावती येथील विमानतळाच्या विस्तार / विकासाकरिता जमीन संपादनासाठी सहाय्यक अनुदान मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्र. एमएडीसी–२०११/प्र.क्र. १३३/२८ अ,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक ९ डिसेंबर, २०११

वाचा: (१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. एव्हीएन १००८/प्र.क्र ६७७/२८.अ, दिनांक २७ फेब्रवारी, २००९ आणि दिनांक ३१ ऑगस्ट, २००९

(२) अतिरिक्त जिल्हाधिकारी, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांचे पत्र क्र. मविविकं/मिहान/१५/१४६१, दिनांक ९ नोव्हेंबर, २०११

**प्रास्ताविक** :– बेलोरा, जिल्हा अमरावती येथील विमानतळाचा महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांचेमार्फत सार्वजनिक खाजगी सहभागातून विस्तार/ विकास करण्यासाठी आणि याकरिता अंदाजे ४६०.३० हेक्टर जमीन संपादन व या प्रित्यर्थ महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांना अंदाजे रू. ६४.३३ कोटी सहाय्यक अनुदान मंजूर करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ आणि दिनांक ३१ ऑगस्ट, २००९ अन्वये प्रशासकिय/ वित्तिय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांना ऑक्टोबर, २०११ अखेर एकूण रू. ४५.८५ कोटी सहाय्यक अनुदान मंजूर / वितरित करण्यात आले आहे.

महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांनी संदर्भाधीन दिनांक ९ नोव्हेंबर, २०११ च्या पत्रान्वये अमरावती विमानतळाच्या विस्तार/ विकासाकरिता पहिल्या टप्प्यामध्ये अंदाजे २८४ हेक्टर (७१०.३७ एकर) जमीन संपादनासाठी महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांनी गठीत केलेल्या समितीने शिफारस केल्याप्रमाणे खालीलप्रमाणे:– एकूण रू. ५७.६० कोटी खर्चाकरिता शासनाची मान्यता देण्याबाबत सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता

(अ) **जमीन संपादनाचा खर्च**

| अनु. क्र | जमिनीचा प्रकार / वर्गवारी | हेक्टर (एकर) | प्रती एकर प्रस्तावित दर (रू. लक्ष) | एकूण खर्च (रू. लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १. | जिरायत | ४३४.७२ | ६.०० | २६०८.३२ |
| २. | हंगामी बागायत | १६५.३५ | ९.०० | १४८८.१५ |
| ३. | बागायत | ११०.३० | १२.०० | १३२३.६० |
| **एकूण** | | **७१०.३७** | — | **५४२०.०७** |

(ब) इमारती व अकृषिक जमीन संपादन :– रू. १.७० कोटी
(क) आस्थापना शुल्क :– रू. १.७० कोटी

**शासन निर्णय :–**

२. बेलोरा, जिल्हा अमरावती येथील विमानतळाचा महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांचेमार्फत सार्वजनिक खाजगी सहभागातून विस्तार / विकास करण्यासाठी पहिल्या टप्प्यामध्ये अंदाजे २८४ हेक्टर (७१०.३७ एकर) जमीन संपादनासाठी वर नमूद केलेल्या जमिनीच्या वर्गवारी नुसार महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांना अंदाजे एकूण रू. ५७.६० कोटी (रूपये सत्तावन्न कोटी साठ लक्ष फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर करण्याकरिता आणि याप्रित्यर्थ चालू आर्थिक वर्षी एकूण रू. ११.७५ कोटी (रूपये अकरा कोटी पंच्याहत्तर लक्ष फक्त) सहाय्यक अनुदान मंजूर करण्याकरिता शासन मान्यता देत आहे.

३. वरीलप्रमाणे चालू आर्थिक वर्षी एकूण रू. ११.७५ कोटी सहाय्यक अनुदानाची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या. यांना अदा करण्यासाठी सहाय्यक संचालक विमानचालन संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि संचालक विमानचालन संचालनालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर एकूण रू. ११.७५ कोटी सहाय्यक अनुदान मासिक निधी वितरण प्रणालीनुसार वितरित करण्यात यावे. तसेच मासिक खर्चाचा अहवाल शासन आणि महालेखापाल यांना सादर करावा.

४. या प्रित्यर्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च सन २०११– १२ च्या आर्थिक वर्षाच्या अंदाज पत्रकामध्ये खालील लेखाशिर्षा अंतर्गत मंजूर तरतूदीतून भागण्यात यावा आणि त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. ए–७
३०५३ नागरी विमान चालन, ०२ विमानतळे,
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य – राज्य योजना
(००) (०२) महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीस विमानतळाच्या विकासाकरिता सहाय्यक अनुदान (३०५३०६४)
३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने सदर विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र८९९./११/व्यय ४ दिनांक ९ डिसेंबर, २०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्र. 201112091083954001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ज्ञा. ल. सुळ)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रती :—
मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मा. मंत्री आणि मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्या, मुंबई
प्रधान सचिव (महसूल / वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (विमान चालन) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
विभागिय आयुक्त, अमरावती
जिल्हाधिकारी, अमरावती
संचालक / सहाय्यक संचालक, विमान चालन संचालनालय, मुंबई
उप सचिव, (विमान चालन) सामान्य प्रशाससन विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा) महाराष्ट्र मुंबई /नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
कक्ष अधिकारी (कार्यासन २५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (२८ अ)